**स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत राज्यातील ४ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्यातील निधीचा पहिला हप्ता वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांक: स्वमअ-२०१९/प्र.क्र.११२(३)/नवि-३४**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १९ ऑक्टोंबर, २०१९

वाचा:

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४,दि. १५.०५.२०१५.
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वमअ-२०१७/प्र.क्र.४३/नवि-३४,दि. ३१.०३.२०१७.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८ जुलै, २०१९
५) केंद्र शासनाच्या गृह निर्माण व नगरीकार्य मंत्रालयाचे आदेश क्रमांक १/७/२०१५-SBM [Computer No. ३१०४७०६], दिनांक १३ सप्टेंबर, २०१९.
६) शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०१९/प्र.क्र.११२(३)/नवि-३४, दिनांक: १८ सप्टेंबर, २०१९

**शासन निर्णय:**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्यातील निधीचा वितरीत करण्याबाबतचा संदर्भाधिन क्रमांक ६ येथील दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

२. देशातील सर्व शहरे पूर्णपणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि स्वच्छ पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने “स्वच्छ भारत अभियान (नागरी)” ची अंमलबजावणी सुरु केली आहे. या अभियानाच्या धर्तीवर राज्यामध्ये संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” राबविण्यात येत आहे.

३. स्वच्छ भारत अभियानांतर्गत घनकचरा व्यवस्थापनासाठी राज्य शासनामार्फत मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने ४ शहरांचे रुपये ६७,१३,००,०००/-( रूपये सदुसष्ठ कोटी तेरा लक्ष फक्त ) इतक्या किंमतीचे प्रस्ताव केंद्र शासनास निधीकरीता सादर करण्यात आले होते. केंद्र शासनाने संदर्भीय क्र. ५ येथील आदेशान्वये केंद्र शासनाचा अनुज्ञेय हिस्सा रुपये २३,५८,००,०००/- (रूपये तेवीस कोटी अठ्ठावन्न लक्ष फक्त) पैकी पहिला हप्ता म्हणून रुपये ११,७९,००,०००/- (रूपये अकरा कोटी एकोणऐंशी लक्ष फक्त) एवढा निधी राज्यास वितरीत केला आहे.

४. स्वच्छ भारत अभियानांतर्गत केंद्र शासनाने राज्यातील ४ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या नागरी घनकचरा व्यवस्थापन प्रकल्पांसाठी राज्यासाठी वितरीत केलेला पहिल्या हप्त्याचा निधी रुपये ११,७९,००,०००/- (रूपये अकरा कोटी एकोणऐंशी लक्ष फक्त) व त्या प्रमाणात राज्य शासनाचा रूपये ७,८६,०४,०००/- (रूपये सात कोटी शहाऐंशी लक्ष चार हजार फक्त) असा केंद्र व राज्य हिश्याचा मिळून

एकूण रूपये १९,६५,०४,०००/- (रूपये एकोणीस कोटी पासष्ठ लक्ष चार हजार फक्त ) इतका निधी राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे. सदरचा खर्च पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार संबंधित लेखाशिर्षासमोर दर्शविल्याप्रमाणे संबंधित लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा.

| अ. क्र | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत करण्यात आलेली निधी रूपये |
|---|---|---|
| अ) | **महानगरपालिकांना** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७६) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा ७५%), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७५२) योजनांतर्गत | १०,५५,१५,०००/- (रूपये दहा कोटी पंचावन्न लक्ष पंधरा हजार फक्त) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७७) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७६१) योजनांतर्गत | ७,०३,४७,०००/- (रूपये सात कोटी तीन लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त) |
| ब) | **नगरपरिषद** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७८) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपरिषदांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७७९) योजनांतर्गत | १,२३,८५,०००/- (रूपये एक कोटी तेवीस लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७९) स्वच्छ भारत अभियानासाठी नगरपरिषदांना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७८८) योजनांतर्गत | ८२,५७,०००/- (रूपये ब्याऐंशी लक्ष सत्तवन हजार फक्त) |

५. सदर निधी आहरित करण्यासाठी राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करून ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सादर करून सदर निधी आहरित करून धनादेश प्राप्त करून घेण्यात यावा. सदर निधीचे वाटप या शासन निर्णयासोबतच्या **विवरणपत्र-अ** मध्ये नमूद केल्यानुसार सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्याबाबतची कार्यवाही राज्य अभियान संचालक यांनी करावी.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १.४.२०१९ व क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८.७.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८.७.२०१९ मधील परिच्छेद क्र. ४ ते १९ मधील

अनुक्रमांक ४, ५, ६, ८, १०, ११, १२, १४, १५, १६, १८, १९ अटी लागू नाहीत व उर्वरित ७, ९ , १३ व १७ या अटींची पुर्तता करण्यात आली असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

८. वित्त विभागाच्या क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.७.२०१९ रोजीच्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टामधील अनुक्रमांक ९ मधील तपासणी सूचिमधील १ ते ५ व ७ आणि ९ या अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे, तसेच उर्वरित अटी लागू नाहीत.

९. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८ जुलै, २०१९ नुसार केंद्र पुरस्कृत योजने संदर्भात केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करुन घेण्यात आली आली आहे. त्यानुसार सदर शासन निर्णयान्वये एकूण रुपये १९,६५,०४,०००/- (रूपये एकोणीस कोटी पासष्ठ लक्ष चार हजार फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

१०. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ व क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनाक ०८ जुलै, २०१९ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ-३३२/अर्थोपाय, दि. १६/९/२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०१९१८४५०३९६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2019.10.19 18:46:11 +05'30'

(अजित पालवे)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
८. आयुक्त, सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिका
९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.

१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१६. मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत (दर्यापूर, चिमूर, चांदवड)
१७. निवडनस्ती, नवि-३४

**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०१९/प्र.क्र.११२(३)/नवि-३४, दिनांक १९ ऑक्टोंबर, २०१९ सोबतचे विवरणपत्र**

## विवरणपत्र-अ

| अ.क्र. | शहराचे नाव | प्रकल्पाची मंजूर किंमत | केंद्र शासनाचा अनुज्ञेय निधी | केंद्र शासनाकडून वितरीत पहिला हफ्ता | राज्य शासनाचा अनुज्ञेय निधी | राज्य शासनाचा वितरीत करण्यात येत असलेला पहिला हफ्ता | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला केंद्र व राज्य हिश्याचा पहिला हफ्ता |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| **महानगरपालिका** | | | | | | | |
| १ | सांगली-मिरज-कुपवाड | ६०.०५०० | २१.१०३० | १०.५५१५ | १४.०६९४ | ७.०३४७ | १७.५८६२ |
| **नगरपरिषद** | | | | | | | |
| २ | दर्यापूर | २.४४०० | ०.८५४० | ०.४२७० | ०.५६९४ | ०.२८४७ | ०.७११७ |
| ३ | चिमूर | १.७१०० | ०.५९८० | ०.२९९० | ०.३९८७ | ०.१९९३ | ०.४९८३ |
| ४ | चांदवड | २.९३०० | १.०२५० | ०.५१२५ | ०.६८३४ | ०.३४१७ | ०.८५४२ |
| **एकूण** | | **६७.१३००** | **२३.५८००** | **११.७९००** | **१५.७२०८** | **७.८६०४** | **१९.६५०४** |